शासन सेवेतील मागासवर्गीय/अमागासवर्गीय कर्मचारी/ अधिकारी यांची पदोन्नतीच्या संवर्गातील आपापसातील ज्येष्ठता विनियमित करण्याबाबत.

विरपालसिंग चौहान, जगदिशलाल व अजितसिंग (२) प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय, क्रमांकःएसआरव्ही-२००१/प्र.क्र.२८/२००१/१२,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २० मार्च,२००३.

संदर्भ :- (१) शासन अधिसूचना,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकःएसआरव्ही-१०७६/१२,दिनांक २१ जून,१९८२.

(२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकःएसआरव्ही-१०९६/प्र.क्र.३२/९६/१२,दिनांक १९ एप्रिल,१९९७

(३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकःएसआरव्ही-१०९६/प्र.क्र.३२/९६/१२,दिनांक २० ऑक्टोबर,१९९७.

**शासन निर्णय :-**

शासन सेवेतील कर्मचाऱ्यांची/अधिकाऱ्यांची पदोन्नतीनंतरची सेवाज्येष्ठता ठरविण्यासंबंधी सर्वसाधारण तत्वे शासन अधिसूचना,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकःएसआरव्ही-१०७६/१२, दिनांक २१ जून,१९८२ अन्वये विनियमित केलेली आहेत. तसेच शासन सेवेतील मागासवर्गीय/अमागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांची पदोन्नत संवर्गात आपापसातील जेष्ठता विनियमित करण्याबाबतचे आदेश शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःएसआरव्ही-१०९६/प्र.क्र.३२/९६/१२, दिनांक २०/१०/१९९७ अन्वये निर्गमित केले आहेत.

२. केंद्र शासन विरुध्द विरपालसिंग चौहान, जगदिशलाल विरुध्द हरियाना राज्य शासन आणि अजितसिंग (२) विरुध्द हरियाना राज्य शासन प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने मागासवर्गीय/अमागासवर्गीय कर्मचारी/अधिकारी यांच्या पदोन्नती संवर्गात ज्येष्ठते संदर्भात वेगवेगळे निर्णय दिले होते. मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेले निर्णय लक्षात घेऊन भारतीय संविधानाच्या अनुच्छेद १६ (४-अे) मध्ये "In matters of Promotion to any class" ऐवजी "In matters of Promotion, with consequential seniority, to any class" अशी दिनांक १५ जून,१९९५ पासून पूर्वलक्षी प्रभावाने सुधारणा केंद्र शासनाने केली आहे. त्यानुसार शासन सेवेतील मागासवर्गीय/अमागासवर्गीय कर्मचारी/अधिकारी यांची पदोन्नत संवर्गात आपापसातील जेष्ठता पदोन्नतीच्या दिनांकाच्या आधारे विनियमित करण्याबाबत केंद्र शासनाने ज्ञापन क्रमांक:२००११/१/२००१/इएसटीटी (डी), दिनांक २१/१/२००२ अन्वये सुधारीत आदेश निर्गमित केले आहेत.

(कृ.मा.प...

H-1255 (4000-3-03) 1

D:\Jagkar\ValviLetter-N.

३.   केंद्र शासनाने भारतीय संविधानामध्ये केलेली दुरुस्ती व त्यानुसार निर्गमित केलेले दिनांक २१/१/२००२ चे आदेश विचारात घेता राज्य शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, शासन सेवेतील मागासवर्गीय/अमागासवर्गीय कर्मचारी/अधिकारी यांची पदोन्नत संवर्गात आपापसातील जेष्ठता विनियमित करण्याबाबत वर नमूद केलेल्या दिनांक २१ जून,१९८२ च्या अधिसूचनेतील आणि दिनांक २०/१०/१९९७ च्या आदेशातील सूचना कायम राहतील. त्यामुळे मागासवर्गीय व अमागासवर्गीय उमेदवारांच्या निवडसूचीतील क्रमानुसार दिलेल्या नियमीत पदोन्नतीच्या दिनांकाचे आधारे पदोन्नतीच्या संवर्गातील त्यांची परस्पर ज्येष्ठता निश्चित होईल.

४.   सर्व विभागांनी/नियुक्ती अधिकाऱ्यांनी यास्तव त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व संवर्गाच्या ज्येष्ठतायाद्या प्रकाशित करताना वरील सूचना लक्षात घेवून कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

बा.बा.नारायणकर
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
मंत्रालयीन विभागांचे सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा),मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालय,मुंबई,
* महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई,
* महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र नागपूर,
* महालेखापाल-१ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई,
* महालेखापाल-२ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अखत्यारीतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती

* पत्राने.

--------